**मौ. गुंजाळी, ता. पाटण, जि. सातारा येथे कोयना नदीवर घाट व पूर संरक्षक भिंत कामाच्या प्रस्तावास प्रशासकीय मंजुरी मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**जलसंपदा विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक: प्रशामा-२०१६/ (प्र.क्र. ५५८/२०१६)/ सिं.व्य.(महसूल)**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई ४०००३२,

दिनांक: ०६ मार्च, २०२०.

**वाचा :** १) शासन परिपत्रक क्र. एफडीडब्ल्यू १०९२/१७०-सिंव्य,(कामे) दिनांक ७ ऑगस्ट, १९९२

२) शासन निर्णय क्र. पूसंभि२०१९/(प्र.क्र.११५/२०१९) सिंव्य.म.दि.३१/८/२०१९

३) कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र कृष्णा खोरे पाटबंधारे विकास महामंडळ, पुणे यांचे पत्र क्र. मकृखोविम/सिंव्य-२/३०/(८५/२०२०)/८०८ दि. १०.०२.२०२०.

**प्रस्तावना :-**

**मौ. गुंजाळी** हे गांव पंढरपूर चिपळूण राज्य मार्गावरील नेरळे गौंड या फाट्यापासून ४.५० कि.मी. असून कराड पासून ४२ कि. मी. अंतरावर दुर्गम भागात आहे. गुंजाळी हे कोयना नदीच्या उजव्या तीरावर वसलेले आहे. गावच्या नदीकाठच्या मातीच्या विशिष्ट स्वरुपामुळे, कोयना धरणातून नेहमीच्या सोडण्यात येणाऱ्या विसर्गामुळेदेखील सदर नदीकाठची मोठ्या लांबीच्या भागात सतत धूप होत असते. कोयना नदीवर हेळगांव गांवाजवळ कोयना धरण असून त्याची साठवण क्षमता १०५ टीएमसी आहे. कोयना धरणाच्या सहा वक्र दरवाज्यातून सन २००५-२००६ साली पावसाळ्यात जास्तीत जास्त १,१०,००० घ.फु./सेकंद व ऑगस्ट २०११ मध्ये १,३०,००० घ.फु./से.या विसर्गाने पाणी कोयना नदीत सोडण्यात आले. त्यामुळे सदर नदीकाठचे ग्रामस्थ या मोठ्या प्रमाणातील जमिनीची धुप झाल्यामुळे भुमीहीन झाल्याचे नमूद करत आहेत. गुंजाळी गावाचे वरील मुक्त पाणलोट क्षेत्रावरील पर्जन्यमान व कोयना धरणातून सोडलेले पाणी यामुळे पूर परिस्थिती निर्माण होते. पुरामूळे राहती मुख्यत्वेकरुन जमिनीचे प्रचंड प्रमाणात नुकसान होत आहे. तसेच नदीचा तीव्र तळ उतार यामुळे नदीच्या उजव्या तीराच्या जमिनीची पुरामुळे धूप होऊन गावठाणालगतचा नदीकाठ अस्थीर होत आहे. सदर कामाची मागणी **ग्रामपंचायत गुंजाळी, ता. पाटण, जि. सातारा यांनी ठराव क्र. ६, दि. १९.८.२०१६** रोजी केला आहे. तसेच मा. श्री. शंभूराजे देसाई, तत्कालिन विधान सभा सदस्य तथा मा. राज्यमंत्री गृह (ग्रामीण), वित्त, नियोजन, राज्य उत्पादन शुल्क, कौशल्य विकास व उद्योजक, पणन यांनी पाटण यांनी यापूर्वीचे २-३ अधिवेशनात लक्षवेधी सूचना मांडली होती. तसेच दिनांक ४/२/२०२० रोजीच्या पत्रान्वये सदर बाब पुनश्चः मा. मंत्री (जलसंपदा) यांच्या निर्देशनास आणलेली आहे. सदर पत्रावर मा. मंत्री (जलसंपदा) यांनी सदर

अंदाजपत्रक मान्यतेसाठी तातडीने सादर करावे असे निर्देश दिले आहेत. सदर बाब विचारात घेता **मौ. गुंजाळी** येथे कोयना नदीवर घाट व पूरसंरक्षक भिंत बांधण्याच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र कृष्णा खोरे पाटबंधारे विकास महामंडळ, पुणे अंतर्गत मौ. गुंजाळी, ता. पाटण, जि. सातारा येथे कोयना नदीवर घाट व पूरसंरक्षक भिंत बांधण्याच्या कामासाठी **रू. ३,०४,७५,९५३/-** व अनुषंगिक खर्च **रू. ५१,८०,९११/-** अशा एकूण **रू. ३,५६,५६,८६४/-** (रू. तीन कोटी छपन्न लाख छपन्न हजार आठशे चौसष्ट रुपये फक्त ) पूर्णांकामध्ये रु. ३५६.५७ लक्ष (तीन कोटी छपन्न लाख सतावन्न हजार) एवढया खर्चाच्या जलसंपदा विभागाच्या सन २०१८-१९ व सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सन २०१९-२० च्या दरसूचीवर आधारित अंदाजपत्रकास खालील अटींच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

अ) शासन निर्णय क्रमांक पुसंभि-२०१९/(प्र.क्र.११५/२०१९)/सिंव्य(म)दिनांक३१/०८/२०१९ मधील तरतूदी नुसार कार्यवाही करावी.

ब) शासन परिपत्रक क्र. एफडीडब्ल्यू-१०८९/२४३/८९/सिंव्य(कामे) ,दि. २१.९.१९८९ व दि.३/५/२०१८ नुसार पूर रेषा आखणी केल्यानंतरच पूर संरक्षक भिंतीची संरेखा निश्चित करावी.

क) i) अंदाजपत्रकात गृहीत धरलेले आराखडे/ संकल्पने ,दरसूची बाहय बाबी व वहन अंतरे सक्षम स्तरावर तपासून अंदाजपत्रकास तांत्रिक मान्यता प्रदान करावी.

ii) तांत्रिक मान्यतेपूर्वी संरक्षक भिंतीचे संकल्पन Loft type किंवा Counterfort इ. पर्यत यांचा विचार करुन खर्च कमी होण्याच्या दृष्टीने मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना यांच्याकडून मंजूर घ्यावे.

ड) कामाचा खर्च उपलब्ध अनुदानातून सुधारित प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत व नियोजित वेळेत पूर्ण करावयाचा आहे. या कामांना सुधारित प्रशाकिय मान्यता दिली जाणार नाही.

इ) भिंतीच्या बांधकामासाठी भूसंपादन करू नये, बांधकामासाठी आवश्यक जमीन संबंधितांनी विनामोबदला उपलब्ध करून द्यावी, पूर संरक्षक भिंतीच्या बांधकामामुळे नदीप्रवाहाला अडथळा निर्माण होणार नाही याची, दक्षता घ्यावी.

ई) पूर संरक्षक योजना राबविल्यानंतर परिसरातील पाण्याचा निचरा योग्य पध्दतीने होईल, याची दक्षता नियोजनात घ्यावी.

प) सदर योजना पूर्ण झाल्यानंतर पूर संरक्षक भिंत मौजे गुंजाळी, ता. पाटण, जि. सातारा ग्राम पंचायतीने ताब्यात घेऊन भविष्यातील देखभाल व दुरूस्ती करावयाची आहे. तांत्रिक मान्यता देण्यापूर्वी तसे लेखी बंधपत्र मौजे गुंजाळी, ता. पाटण, जि. सातारा ग्रामपंचायतीकडून प्राप्त करुन घेण्याची जबाबदारी तांत्रिक मान्यता देण्यास सक्षम अधिका-यांची असेल.

फ) सदरच्या कामांचा कार्यारंभ आदेश काढण्यापासून काम पूर्ण होईपर्यंत त्रैमासिक प्रगती अहवाल शासनास सादर करावा. काम पूर्ण झाल्यानंतर त्याबाबतचे प्रमाणपत्र शासनास त्वरित उपलब्ध करून द्यावे.

ग) सदरहू कामास तांत्रिक मंजुरी देण्यापूर्वी संदर्भ क्र. २ मधील अटींचे कोटेकोरपणे पालन करावे. सदरच्या ठिकाणी पूररेषा निश्चितीची कार्यवाही पूर्ण झाल्याखेरीज या कामांस तांत्रिक मंजुरी देता येणार नाही.

प्रस्तावित कामासाठी होणारा खर्च "४७११, पूर नियंत्रण प्रकल्पावरील भांडवली खर्च, १९०- सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका, (०१) सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका, (०१) (०१) महाराष्ट्र कृष्णा खोरे पाटबंधारे विकास महामंडळ, पुणे भागभांडवली अंशदान (४७११ ०२०९)" या लेखाशीर्षाखाली करावा व मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

या कामास प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता सिं.व्य. (महसुल) कार्यासनाच्या नोंदवहीमध्ये क्र. ०१ / सन २०२० वर नोंदविण्यात आलेली आहे.

वित्तीय अधिकार नियमपुस्तिका -१९७८ भाग पहिला मधील तरतुदीनंतर प्रशासकीय विभागास प्राप्त अधिकार व आंतरवित्तीय सल्लागार व सह सचिव यांच्या सहमतीने हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय संकेतस्थळावर www.maharashtra.gov.in उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक संकेतांक २०२००३०६१५२०४२७९२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sudhakar Nageshrao Aivale

Digitally signed by Sudhakar Nageshrao Aivale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2cc5f92716ab534e424b50ac729583cabc178f93f59c9d32f0507cd1020c53d3, cn=Sudhakar Nageshrao Aivale
Date: 2020.03.06 15:23:11 +05'30'

( सु.ना. ऐवळे )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत :-**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव,

२) मा.मुख्यमंत्री यांचे कार्यालय,
३) मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन, मुंबई
४) मा.सभापती/उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन, मुंबई,
५) मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा,मुंबई यांचे कार्यालय,विधानभवन, मुंबई,
६) मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद ,मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई,
७) मा.मंत्री, जलसंपदा यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई,
८) प्रधानसचिव (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय, मुंबई,
९) सचिव (लाक्षेवि) यांचे स्वीय सहायक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१०) आंतरवित्त सल्लागार व उपसचिव,जलसंपदा विभाग,मंत्रालय, मुंबई,
११) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,मुंबई,
१२) महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,नागपूर,
१३) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे,
१४) मुख्य अभियंता, (जसं), जलसंपदा विभाग, पुणे
१५) अधीक्षक अभियंता, सातारा सिंचन मंडळ, सातारा
१६) कार्यकारी अभियंता, कोयना सिंचन विभाग, कोयनानगर
१७) निवड नस्ती - सिं.व्य.(महसूल)